महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या सातारा
बसस्थानकाच्या आधुनिकीकरणाच्या विकास
कामासाठी निधी वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह ( परिवहन ) विभाग
## शासन निर्णय क्रमांकः एसटीसी-०५१४/प्र.क्र.-२४६/परि-१,

जागतिक व्यापार केंद्र, कफ परेड, मुंबई - ४०० ००५
दिनांक: १३ नोव्हेंबर २०१४.

**वाचा**

१) नियोजन विभागाचे अ.शा.पत्र क्रमांक संकीर्ण-२०१४ /प्र.क. २७/ का.१२११ दिनांक २९ मे २०१४
२)उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, म.रा.मा.प.महामंडळ यांचे पत्र क्र. राप/स्थाअ/कामे/२०४६, दिनांक २९.०५.२०१४.
३)उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक,म.रा.मा.प.महामंडळ यांचे पत्र क्र. राप/स्थाअ/कामे/३२४२, दिनांक २०.०८.२०१४.

**प्रस्तावना**

सातारा येथील राज्य परिवहन महामंडळाच्या बसस्थानकाच्या विकास कामाकरीता रु.५३२.०० लक्ष इतका निधी नियोजन विभागाच्या दिनांक २९ मे २०१४ च्या पत्रान्वये उपलब्ध करुन देण्यात येऊन सदरचा निधी सन २०१४-१५ मध्ये अर्थसंकल्पित करुन त्याच वर्षात खर्च करण्याबाबत सूचित केलेले होते. त्यानूसार सदर कामासाठी रु.५३२.०० लक्ष निधी अर्थसंकल्पित झालेला आहे. सदर तरतूद महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. आता सदर कामांना तरतूद वितरीत करण्याबाबत पुढील प्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय

सन २०१४-१५ मधील शासनाच्या सर्वसाधारण योजने अंतर्गत मागणी क्र. बी-३ लेखाशिर्ष ३०५५, १९० सार्वजनिक क्षेत्र व इतर उपक्रमांना अर्थसहाय्य, (००) (००) महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या बसस्थानकांच्या आधुनिकीकरणांतर्गत बांधकाम व इतर सोईसुविधा (३०५५ ००५२). ३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदानांतर्गत सातारा बसस्थानकाच्या आधुनिकीकरणाच्या विकास कामासाठी रु. ५३२.०० लक्ष इतकी तरतूद वितरणास उपलब्ध आहे. सदर तरतुदीमधून खालील कामांना पुढीलप्रमाणे निधी वितरीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कामाचे नाव | वितरित करण्यात आलेली तरतुद |
|---|---|---|
| १. | चालक वाहक विश्रांतीगृह | रु. ५०.०० लक्ष |
| २. | महिला वाहक/कर्मचारी विश्रांतीगृह | रु.२०.०० लक्ष |
| ३. | बसस्थानकाच्या वाहनतळाचे कॉंक्रीटीकरण | रु.१७१.०० लक्ष |
| ४. | आगाराच्या वाहनतळाचे कॉंक्रीटीकरण | रु. १६०.०० लक्ष |
| ५. | सी.सी.टि.व्ही. व्यवस्थापक व नियंत्रण कक्ष | रु.३०.०० लक्ष |
| ६. | बस इन बस आऊट प्रणाली | रु.१०१.०० लक्ष |
| | एकुण रक्कम रुपये | रु.५३२.०० लक्ष |

सदर तरतूद शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश, शासन निर्णय, अधिसूचना, वित्तीय कार्यपध्दती इ. चे काटेकोर पालन करुन खर्च करण्यात यावी.

वरीलप्रमाणे कार्यवाही करण्यास परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करावी.

हा शासन निर्णय नियोजन विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २७९/१४६१ दिनांक ०१/०९/२०१४ व वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९/९/व्यय-८, दि.१०/०९/२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१११३१७१११०९७२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhimrao Ramrao Wadhave

Digitally signed by Bhimrao Ramrao Wadhave
DN: CN = Bhimrao Ramrao Wadhave, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = HOME
Date: 2014.11.14 11:03:42 +05'30'

**भि.रा. वाढवे**

सह सचिव,गृह (परिवहन) विभाग, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
२. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई,

३. उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
६. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई ४०० ०५१
७. वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई
८. वित्त विभाग (व्यय -८/साऊ अर्थसंकल्प-१०/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
९. गृह विभाग (बीयुडी-१/बीयुडी-२/परिवहन-३/परिवहन-४), मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती.